**सार्वजनिक बांधकाम विभागातील क्षेत्रिय कार्यालयातील गट-क संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या बदल्या / प्रतिनियुक्तीबाबत मार्गदर्शक सूचना..**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०२४/प्र.क्र.५४/सेवा-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २८ जून, २०२४

**वाचा :-** महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ पारित करण्यात आलेला आहे. सदर कायद्यात शासकीय कर्मचाऱ्यांच्या सर्वसाधारण बदल्या सामान्यपणे वर्षातून केवळ एकदाच एप्रिल किंवा मे महिन्यात करण्याची तरतूद आहे. तथापि, सार्वजनिक बांधकाम विभागातील क्षेत्रिय कार्यालयातील गट-क संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या बदल्या झाल्यानंतरही काही कर्मचारी बदलीच्या ठिकाणी हजर होत नाहीत किंवा सदर कर्मचाऱ्यांची बदली झाली असली तरी त्यांना प्रतिनियुक्ती/उसनवारी तत्वावर घेऊन पुन्हा त्याच ठिकाणी कार्यरत ठेवण्यात आल्याचे निदर्शनास आले आहे. त्यास अनुसरुन मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन परिपत्रक :-**

१) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ नुसार शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्या करण्यात आल्यानंतर कर्मचाऱ्यांना बदलीच्या ठिकाणी हजर होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करण्याची जबाबदारी संबंधित नियुक्ती प्राधिकारी यांची राहील.

२) बदलीने नवीन ठिकाणी पदस्थापना झालेल्या कर्मचाऱ्यांना पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू करुन घेणे आवश्यक राहील.

३) बदली झालेल्या कर्मचाऱ्यांचे उसनवारी अथवा प्रतिनियुक्तीचे आदेश काढण्यात येवू नयेत अशी कृती केल्यास संबंधित नियुक्ती प्राधिकारी जबाबदार राहतील व त्यांचेवर नियमानुसार शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल याची नोंद घ्यावी.

४) बदली झालेल्या कर्मचाऱ्याने पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यास टाळाटाळ केल्यास अथवा राजकीय दबाव आणल्यास संबंधित कर्मचाऱ्यांवर नियमानुसार शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात यावी.

५) बदली झालेला कर्मचारी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू न होता पुन्हा त्याच ठिकाणी कार्यरत असल्याचे आढळून आल्यास संबंधित कर्मचाऱ्यावर शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात यावी. तसेच याबाबत संबंधित नियुक्ती प्राधिकारी यांचेवर देखील शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात यावी.

६) बदली झालेला कर्मचारी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू न झाल्यास त्याचे वेतन अदा करण्यात येवू नये.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६२८१६४७३१६११८ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

POOJA BHASKAR UDAWANT

Digitally signed by POOJA BHASKAR UDAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=3a216aeb67842b82e08ea38ee54173f5a527cd40299fd7cb135e0abc12d5ab49, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=C0BDDEC9E386D4BD1D8C49113A8F429650B2609DEA0BDA6E1ED8FD55A0D6A5FD, cn=POOJA BHASKAR UDAWANT
Date: 2024.06.28 17:01:07 +05'30'

**( पुजा भा. उदावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सा.उ.वगळून), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (रस्ते)/सचिव(बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/कोकण/औरंगाबाद/पुणे/नाशिक/अमरावती/नागपूर/नांदेड,
५. मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग (सा.बां.), नवी मुंबई.
६. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, मुंबई
७. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ, मुंबई/औरंगाबाद/पुणे/अमरावती/नागपूर/नांदेड/नाशिक,
८. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळे,
९. सर्व अधीक्षक अभियंता (विद्युत), प्रादेशिक विद्युत मंडळे, सार्वजनिक बांधकाम विभाग (मुंबई/पुणे/नांदेड/नागपूर)
१०.अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई.
११.संचालक, उपवने व उद्याने, मुंबई
१२.कक्ष अधिकारी (सेवा-१, सेवा-२, सेवा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. निवडनस्ती (सेवा-४), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.